# सोन्याच्या तीन मोहरा

## एक यूनानी कहाणी

अलीकी

मराठी : अश्विनी बर्वे

अलीकीच्या अनेक युनानी कहाण्या परत परत सांगितल्या गेल्या आहेत आणि त्यासाठी सुंदर चित्रे काढली गेली आहेत.

ही कहाणी यानिस नावाच्या गरीब शेतकऱ्याची आहे.यानिस अनेक वर्षांपासून एका श्रीमंत माणसाच्या घरी काम करत होता आणि त्याबदल्यात यानिसला त्याच्या मालकाने भेट म्हणून सोन्याच्या तीन मोहरा दिल्या. यानिस ने त्या मोहरा काही महत्वाच्या गोष्टींसाठी बदलल्या. त्यामुळे त्याच्या दयनीय्याय अवस्थेत बदल होऊन त्याच्या आयुत आनंद आला.

अलीकी ने या कहाणीमध्ये सुंदर चित्रामधून ग्रीसची (युनान) झलक दाखवली आहे.

# सोन्याच्या तीन मोहरा

## एक यूनानी कहाणी

मराठी : अश्विनी बर्वे



ग्रीस (युनान) मधल्या एका गावात यानिस नावाचा एक गरीब माणूस राहत होता. तो सकाळ संध्याकाळ खूप कष्ट करत होता तरीसुद्धा तो आपल्या बायकोमुलाला खाऊ घालू शकत नव्हता.



आपल्या कुटुंबाला चांगले दिवस आले पाहिजे असा विचार यानिसने केला, त्यासाठी त्याला त्याचा देश सोडून विदेशात जावे लागणार होते, तिथे चांगल्या नोकऱ्या उपलब्ध होत्या.

यानिसने आपल्या कुटुंबाचा निरोप घेतला,पुरेशी कमाई झाली की तो परत घरी येईन असे वचन त्याने दिले. मग त्या कमाईतून आपल्या कुटुंबाच्या गरजा भागवू शकेल.

दुसऱ्याच दिवशी यानिस प्रवासाला निघाला.



तो तीन आठवडे चालत होता, शेवटी तो टर्कीची पूर्व राजधानी कांस्टेंटीनोपिलला पोहचला.

त्या मोठ्या शहरात यानिसने खूप प्रयत्न केले पण त्याला नोकरी मिळाली नाही. त्याच्यासारखे नोकरीच्या शोधात आलेले खूप लोक तिथे होते.मग एक दिवस त्याला कळले की, एका श्रीमंत माणसाला नोकराची खूप गरज आहे. यानिस त्या श्रीमंताला भेटायला गेला.



त्या वृद्ध श्रीमंताला यानिस खूप आवडला आणि त्याने त्याला लगेच कामाला ठेवून घेतले. यानिसने एकनिष्ठने आणि प्रामाणिकपणे आपल्या मालकाची सेवा केली. त्यामुळे यानिसला खायलाप्यायला आणि राहायला जागा मिळाली. पण त्या मालकाने यानिसचा पगार त्याच्याकडेच ठेवला. तो म्हणाला की, एक दिवस तो सगळा पगार एकदम देईन.

यानिसला पूर्वी पेक्षा आत्ताची स्थिती अधिक चांगली आहे असे वाटले म्हणून तो आनंदाने मेहनत करत राहिला.

अशा तऱ्हेने दहा वर्षे निघून गेली. यानिसला आपल्या कुटुंबाची आठवण यायला लागली.मग त्याने घरी जाण्याचा निर्णय घेतला. त्याने मालकाला घरी जाण्याची गोष्ट सांगितली.

“यानिस तू माझी खूप काळजी घेतली, सेवा केली,” तो श्रीमंत माणूस म्हणाला. “हे घे तुझ्या कमाईच्या सोन्याच्या तीन मोहरा.” याबरोबरच त्याने यानिसला प्रवासासाठी शुभेच्छा सुद्धा दिल्या.



यानिसला तर विश्वासच बसला नाही, की दहा वर्षे नोकरी करून इतके कमी पैसे! पण यानिस याबाबत काही करू शकत नव्हता. त्याने त्या मोहरा सांभाळून ठेवल्या आणि मालकाचा निरोप घेतला.

जसा यानिस जायला निघाला तसे मालकाने त्याला परत बोलावले.

“जर तू मला सोन्याची एक मोहर परत केली तर मी तुला खूप उपयोगाचा सल्ला देईन.”

तसे तर यानिसला सल्ल्याची काही गरज नव्हती. त्याला नाही म्हणायचं होतं, पण एक आज्ञाधारक नोकर असल्यामुळे त्याने एक सोन्याची मोहर परत केली.

*मालक म्हणाला, “लक्षात ठेव”*

*“ज्या गोष्टीचे तुला घेणे देणे नाही त्याबद्दल काहीही चौकशी करू नको.”*

यानिस म्हणाला, “ठीक आहे मालक.”

आता जेव्हा यानिस जायला लागला तेव्हा त्या श्रीमंताने परत त्याला बोलावले.

“मला अजून एक सोन्याची मोहर दिली तर परत मी एक खूप कामाचा असा सल्ला तुला देईन.”

यानिस कचरला. मी काय फक्त एक सोन्याची मोहर घेवून घरी जाऊ की काय?”

खूप संकोचाने आणि उदास्तेने यानिसने मालकाला दुसरी मोहर सुद्धा दिली, तेव्हा मालक म्हणाला, *"एकदा एक रस्ता निवडला की तो सोडू नको!"*

यानिसने मालकाने सांगितलेल्या गोष्टीं लक्षात ठेवण्याचे वचन दिले. परत तो घरी जाण्यासाठी तयार झाला. तेव्हाच त्याला परत त्याच्या नावाची हाक ऐकू आली.



“यानिस तू तुझी शेवटची सोन्याची मोहर मला दे मग मी अजून एक तुझ्या उपयोगाचा सल्ला देईन.”



तिसऱ्या वेळीसुद्धा गरीब बिचारा यानिस नाही म्हणू शकला नाही.

मालक म्हणाला, “लक्षात ठेव”, *“रात्री तुला जर राग आला तर दुसऱ्या दिवशी सकाळ पर्यंत तो दाबून ठेव.”*

यानिस म्हणाला, “मी तुम्ही सांगितलेले लक्षात ठेवेन मालक.” नंतर त्याने घरचा रस्ता धरला. आता त्याच्या खिशात दहा वर्षाच्या मेहनतीची फुटी कवडी सुद्धा नव्हती. तो आता घरी जाऊन कसे तोंड दाखवणार होता?

काही वेळ प्रवास केल्यानंतर यानिसला एका झाडावर एक काळा माणूस बसलेला दिसला आणि तो पानांना सोन्याच्या मोहरा चिटकवत होता. हे दृश्य त्याला फार विचित्र वाटले. पण तेवढ्यात त्याला मालकाने सांगितलेला सल्ला आठवला. त्यामुळे त्याने काहीच विचारले नाही आणि पुढे जाऊ लागला.

दहा पाऊले पुढे गेल्यानंतर त्या माणसाने यानिसला परत बोलावले.

तो म्हणाला, “हे बघ मागच्या एकशे सात वर्षापासून मी पानांना मोहरा चिटकवत आहे आजपर्यंत जेवढे लोक या झाडाखालून गेले त्यांनी थांबून मला माझ्या कामाबद्दल विचारले.”



यानिस म्हणाला, "मला तुमच्या कामाशी काही घेणंदेणं नाही."

यानिसचे उत्तर ऐकून तो माणूस खुश झाला, तुझ्या या चांगल्या कामासाठी तुला काहीतरी बक्षीस मिळाले पाहिजे.

मग त्याने झाड हलवले, तर काय झाले? सोन्याच्या मोहरा पावसाच्या थेंबासारख्या पडायला सुरुवात झाली.

"मित्रा, या सोन्याच्या मोहरा तू घेवून जा, तुला उपयोगी पडतील."

आपल्या या भाग्याने यानिस खूप खुश झाला.त्याने आपल्या सगळ्या खिश्यामध्ये मोहरा भरल्या. त्याला जितक्या उचलता येत होत्या तेवढ्या त्याने आपल्या पिशवीत भरून घेतल्या. नंतर यानिसने त्या माणसाचे आभार मानले. नंतर तो आपल्या मालकाच्या चांगल्या स्ल्लायाबद्दल विचार करत पुढे चालू लागला.



काही दिवसांच्या प्रवासानंतर यानिसला खेचरांची एक मोठी रांग पाहिली.त्यांच्याबरोबर खेच्चरांचे तीन मालक सुद्धा होते. हा कारवा सुद्धा यानिस ज्या दिशेला जात होता त्याच दिशेने चालला होता. यानिस थकला होता म्हणून त्याने त्या लोकांकडे खेचरावर बसायची परवानगी मागितली.

“जरूर बसा,” खेचराचा मालक म्हणाला, “त्यांच्यावर भरपूर ओझे आहे, अजून एका माणसाचे ओझ्याने त्यांना काही फरक पडणार नाही.”

मग यानिस एका खेचरावर आरामात बसला आणि कारवा हळूहळू पुढे चालू लागला.



काही वेळाने एक धर्मशाळा दिसली आणि खेचरांच्या मालकांना तिथे थांबावे वाटले. त्यांनी यानिसला सुद्धा धर्मशाळेत येण्याचे निमंत्रण दिले. पण तेव्हा यानिसला त्याच्या मालकाने सांगितलेली दुसरी गोष्ट आठवली. त्याने जो रस्ता पकडला आहे तो सोडण्याची त्याला इच्छा नव्हती.

“तुम्ही जा, मी इथे थांबून तुमच्या खेचरांची रखवाली करतो, ”यानिस म्हणाला. तो तिथे थांबून ते लोक येण्याची वाट पाहू लागला.



पण जसे ते तीन लोक धर्मशाळेत घुसले आणि जोरात भूकंप झाला. धर्मशाळा जोरात हलली आणि कोसळली.

त्याच्याखाली आतले सगळे लोक गाडले गेले.



यानिस खुश झाला, त्याने त्याच्या मालकाची गोष्ट लक्षात ठेवली आणि त्याप्रमाणे तो वागला. त्याने त्या खेचरांना हाकारले आणि आपला पुढचा प्रवास सुरु केला.

तीन दिवस प्रवास केल्यानंतर यानिस त्याच्या गावाला पोहचला. आपल्या गावातील रस्ते आणि घर्रे बघून तो खूप खुश झाला. त्याने आनंदाने आपल्या घराचा दरवाजा ठोठावला.



जेव्हा दरवाजा उघडला तेव्हा त्याची बायको समोर उभी होती. इतक्या वर्षानंतर तिने त्याला ओळखले नाही. यानिसने सुद्धा तो कोण आहे हे तिला सांगितले नाही.

“एवढ्या रात्री मी तुम्हांला त्रास दिला त्याबद्दल माफ करा, पण मी माझ्या खेचरांसहित एक रात्र इथे आराम करू शकतो का?” यानिसने विचारले.

ती बाई म्हणाली, ”मी तुम्हांला घरात येण्याची परवानगी देणार नाही. पण तुम्ही घराच्या बाहेर जे मैदान आहे तिथे एक शेड आहे तिथे आराम करू शकतात.”

यानिस स्वतःशीच हसला. त्याने आपले खेचर बांधले आणि दुसऱ्या दिवशी ती आपल्याला ओळखेल तेव्हा तिला किती आश्चर्य वाटेल.





अचानक यानिसला एक पुरुष घरात शिरतांना दिसला. हे पाहून यानिसच्या आनंदाचे रुपांतर रागात झाले.

यानिसने विचार केला, “माझी बायको माझी वाट बघू शकत नव्हती का? तिने दुसऱ्या माणसाशी लग्न केले?

त्याने आपली बंदुक घेतली आणि आपल्या घराच्या कडे निघाला तेव्हाच त्याला त्याच्या मालकाने सांगितलेला तिसरा सल्ला आठवला. त्यानुसार यानिसने सकाळपर्यंत आपला राग दाबून ठेवण्याचे ठरवले.

रात्रभर यानिस जागाच होता.सकाळी कोंबडा आरवण्यापूर्वी त्याने डोळे उघडले आणि तो खेचरांना दाणापाणी करण्यासाठी बाहेर आला.त्याला घराच्या आतूनही आवाज येत होता. याचा अर्थ त्याची बायको सुद्धा उठली होती.

काहीवेळा नंतर घराचा दरवाजा झटकन उघडला आणि दरवाज्यात तोच काल रात्री पाहिलेला माणूसच उभा होता.

“हे बघ आई मी आता कामाला जातो,” तो म्हणाला. “दुपारी खाण्यासाठी मी तुला काही लोबिया पाठवतो.”

मग यानिसने एक दीर्घ श्वास घेतला. तो माणूस म्हणजे यानिसचाच मुलगा होता. दहा वर्षात तो मोठा झाला होता.बरं झालं यानिसने रात्री आपल्या मुलाचे कोणते नुकसान केले नाही. मग यानिस मुलाकडे पळत गेला आणि त्याला जवळ घेवून आपल्या बाबत सांगितले.

नंतर दोघे वडील – मुलगा घरात गेले. तिथे सगळ्या कुटुंबाचे आनंदाने मिलन झाले.

त्यानंतर यानिसने सोन्याच्या मोहरांची थैली उघडली आणि खेचरांवरचे सामान खाली उतरवले. त्यादिवसानंतर यानिस आणि त्याच्या कुटुंबाला कोणत्याही गोष्टीची कधीच कमतरता पडली नाही.





**अलीकी** यांनी लहान मुलांसाठी शेकड्याने पुस्तके लिहली आणि आणि त्यांच्यासाठी सुंदर चित्रेही काढली आहेत.त्या आपले पती फ्रान्ज ब्रांडीनबर्ग बरोबर न्यू-यार्क शहरात राहतात. त्यांना जेसन आणि अलेक्सा अशी दोन मुले आहेत.